राज्यातील सार्वजनिक उपक्रमांना
सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार
सुधारीत वेतनश्रेणी लागू करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक शासाउ १०.०९/प्र.क्र. १२१/सा.उ.**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १९ डिसेंबर, २००९**

**प्रस्तावना :**

सहाव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशी विचारात घेवून राज्य शासकीय पदे व इतर पदे यांना सुधारित वेतनश्रेणीची शिफारस करण्यासाठी राज्य वेतन सुधारणा समिती २००८ ची स्थापना दि २३.९.२००८ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली होती. या समितीने केलेल्या शिफारशीनुसार शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेपुर १२०९/प्र.क्र.२०/सेवा-९, दि २७/२/२००९ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. राज्यातील सार्वजनिक उपक्रमांमधील कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याबाबतचा प्रस्ताव वरील निर्णयात समाविष्ट नव्हता. तथापि, अशा प्रकारचा प्रस्ताव स्वतंत्रपणे शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :**

राज्यातील सार्वजनिक उपक्रमांमधील कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यासंदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

(१) राज्यातील जे उपक्रम नफ्यात आहेत व ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे ज्यांच्या कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणी लागू केल्यामुळे येणारा आर्थिक भार स्वबळांवर पेलू शकतील व पुढील ३ वर्षे नफ्यात राहतील अशी अपेक्षा आहे, तसेच ज्या उपक्रमांनी त्यांचे २००५-०६ पर्यंतचे लेखे विधानमंडळास सादर केले असतील अशा उपक्रमांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याच्या, संबंधित उपक्रमाच्या संचालक मंडळाने मान्य केलेल्या प्रस्तावावर, प्रशासकीय विभागाने वित्त विभागाच्या सहमतीने निर्णय घ्यावा. शासनाकडून त्याप्रित्यर्थ, कोणत्याच उपक्रमांच्या बाबतीत कसलीही आर्थिक तरतूद उपलब्ध करुन दिली जाणार नाही.

MOTE:lwpD:\Latecka\6 pay commission

(२) ज्या उपक्रमांना या अगोदर ६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशी शासन मान्यतेने किंवा शासन मान्यतेशिवाय लागू केलेल्या आहेत, त्यास संबंधित प्रशासकीय विभागाने त्यांचे आर्थिक लेखे तपासून वरील (१) येथील निर्णयाप्रमाणे सुधारीत मान्यता घ्यावी.

(३) अन्य उपक्रमांच्या (जे व्यावसायिक स्वरुपाचे नाहीत व शासनाच्या व्यवस्थापकीय अनुदानांवर अवलंबून आहेत) बाबतीत वरील (१) मध्ये नमूद केल्याप्रमाणे २००५-०६ पर्यंतचे लेखे विधान मंडळास सादर केल्यानंतर संबंधित प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाच्या सहमतीने सुधारित वेतनाचा निर्णय घ्यावा.

२. वरील परिच्छेदात नमूद केलेले निकष जे सार्वजनिक उपक्रम पूर्ण करीत असतील, अशाच उपक्रमातील कर्मचाऱ्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबतचे प्रस्ताव संबंधित प्रशासकीय विभागांनी तपासून, वित्त विभागाच्या सहमतीसाठी सादर करावेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.Maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९१२१९१७५८५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(श. ग. सातपुते)
शासनाचे उपसचिव, वित्त विभाग

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
मुख्य सचिव यांचे सहसचिव
राज्य सार्वजनिक उपक्रमांशी संबंधित सर्व प्रशासकीय विभागांचे
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
राज्य सार्वजनिक उपक्रमांचे व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी इ.
सर्व सहसचिव/उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (सा उ)